राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ग्राम बिजोत्पादन कार्यक्रमासाठी सन २०१७-१८ मध्ये अनुसूचित जमाती संवर्गाकरीता असलेला अखर्चित निधी सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक: योजना ३३१७/प्र.क्र.१६६/१अे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०४ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा** :- १) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्राज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक No.12-01/2015, S.D.-I, दिनांक ०९.११.२०१५.

३) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतची पत्रे क्र.१०-५/२०१७-SD.VI, दि.०४ जुलै,२०१७.

४) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक No.10-01/2018, S.D.-VI, दिनांक २६.०४.२०१८.

५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१७/प्र.क्र.१५७/१अे, दिनांक २६ सप्टेंबर, २०१७.

६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१७/प्र.क्र.११/कार्यासन ६, दिनांक २१ डिसेंबर, २०१७.

७) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना-३३१७/प्र.क्र.१६६/१अे, दिनांक १६ जानेवारी, २०१८.

**प्रस्तावना** :-

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेतील "**ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम**" सन २०१७-१८ मध्ये केंद्र हिस्सा रूपये २२७०.०० लाख व राज्य हिस्सा रूपये १५१३.३५ लाख (केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० प्रमाणे) याप्रमाणे आणि ग्राम बिजोत्पादन कार्यक्रमांतर्गत "**प्रमाणित बियाणे उत्पादन**" कार्यक्रम सन २०१७-१८ मध्ये केंद्र हिस्सा रूपये १६१.३५ लाख व राज्य हिस्सा रूपये १०७.५७ लाख (केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० प्रमाणे) याप्रमाणे राज्यात राबविण्याकरीता दिनांक २६ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती.

२. सदर योजनेत अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी ग्राम बिजोत्पादन कार्यक्रमाकरीता (केंद्र हिस्सा ६० टक्के) रूपये ६७०.०० लाख केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला यांना थेट उपलब्ध करून दिलेले होते. त्याप्रमाणात राज्य हिस्सा रूपये ४४६.६७ लाख असा होता. सदर घटकासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त रूपये ६७०.०० लाख पैकी रूपये

४५४.१६ लाख इतका निधी खर्च झाला असून रू.२१५.८४ लाख एवढा निधी सद्यस्थितीत अखर्चित आहे. तसेच, राज्य हिस्सा (४०%) ४४६.६७ लाख रुपये पैकी उपलब्ध करून देण्यात आलेला निधी रूपये ३४५.५० लाख पैकी रूपये ३०२.७७ लाख इतका निधी खर्च झालेला असून रूपये ४२.७१ लाख इतका निधी अखर्चित असून महाबीजकडे शिल्लक आहे. केंद्र शासनाच्या अखर्चित रकमेच्या प्रमाणात रूपये १०१.१८ लाख इतका राज्य हिस्सा वितरीत करणे आवश्यक आहे.

३. यास अनुसरून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी अनुसूचित जमाती संवर्गासाठी या कार्यक्रमांतर्गत केंद्र हिस्स्याचा अखर्चित निधी सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास दिलेली परवानगी विचारात घेता, **अनुसूचित जमाती घटकाकरीता** केंद्र हिस्सा (अखर्चित) रु.२१५.८४ लाख महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांना सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच, सदर केंद्र हिस्स्यास समरूप राज्य हिस्सा रू. १४३.८९ लाख इतका येत असून सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील रूपये ४२.७१ लाख इतका अखर्चित निधी महाबीजकडे शिल्लक आहे. सदर अखर्चित निधी सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास आणि सन २०१८-१९ मध्ये राज्य हिस्सा मंजूर तरतूद रूपये २२७.०० लाख पैकी (लेखाशिर्ष २४०१ अे ६३७) रूपये १०१.१८ लाख या वर्षीच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतुन वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत (NMAET) बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (SMSP) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ग्राम बिजोत्पादन कार्यक्रमासाठी सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी अनुसूचित जमाती संवर्गासाठी केंद्र हिस्स्याचा अखर्चित निधी सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास दिलेली परवानगी विचारात घेता, **अनुसूचित जमाती घटकाकरीता** केंद्र हिस्सा (अखर्चित) रु.२१५.८४ लाख महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांना सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर केंद्र हिस्स्यास समरूप राज्य हिस्सा रू. १४३.८९ लाख इतका येत असून सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील रूपये ४२.७१ लाख इतका अखर्चित निधी महाबीजकडे शिल्लक आहे. सदर अखर्चित निधी सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास आणि सन २०१८-१९ मध्ये राज्य हिस्सा मंजूर तरतूद रूपये २२७.०० लाख पैकी (लेखाशिर्ष २४०१ अे ६३७) रूपये १०१.१८ लाख या वर्षीच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतुन वितरीत व खर्च करण्यास महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांना मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.
२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेऊन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावीत.
३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर निधी अनुसूचित जमाती संवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्यात येईल याबाबतची दक्षता घेण्यात यावी.

२. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक ०२.४.२०१८ व दिनांक २७.७.२०१८ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता करण्यात यावी. तसेच, सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१६४८३७६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: CN = Prakash R. Kadam, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Agriculture And Adf Department
Date: 2018.10.04 16:54:10 +05'30'

**(प्रकाश रा. कदम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
७. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर .
९. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
१२.उप सचिव (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.उप सचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१६.आदिवासी विकास विभाग (कार्यासन ६), मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती (कार्यासन १-अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.